२.	उपरोक्त निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेला आहे. सदर निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांना या शासन निर्णयाव्दारे अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BDS) मुक्त करण्यात येत असून सदर निधी आहरित करण्याची पुढील कार्यवाही मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांनी करावी.

३.	यावर होणारा खर्च सन २०१०-११ या आर्थिक वर्षामध्ये मागणी क्र. टी-५ (०१)(०१) ग्रामीण भागामध्ये नळाद्वारे पाणी पुरवठा योजना (२२१५ ०५०६) ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध करून देण्यात आलेल्या तरतूदीमधून भागवावा.

४.	सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक संकेतांक २०११०३२५१०४७००००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

सही/-

**( फु. स. मेश्राम )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१,मुंबई.
४. महालेखापाल (लेखापरीक्षा),महाराष्ट्र-१, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र-२,नागपूर.
६. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२,नागपूर.
७. आदिवासी विकास विभाग (का.६), मंत्रालय, मुंबई-३२
८. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. अवर सचिव,कार्यासन क्र.पापु.०४, पापु-०९, लेखाधिकारी, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई.
१०. निवडनस्ती पापु-१०,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

**लेखा शीर्ष २२१५-मागणी क्र. टी-०५ पाणी पुरवठा व स्वच्छता याखाली पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन दिलेला निधी खर्च करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक आउयो- २०१०/प्र.क्र.२५७/पापु-१०**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक - २३ मार्च २०११**

संदर्भ :- १) शासन पत्र, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक ग्रापापु-१५०७/प्र.क्र.-१२४/पापु-१७, दिनांक ३ मार्च २००८ व प्र.क्र.१०७, दिनांक ३ मार्च २००८.

२) शासन निर्णय, आदीवासी विकास विभाग, क्रमांक बीयुडी २००८/प्र.क्र.६/का-०७, दिनांक ७ मार्च २००९.

३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नाशिक यांचे पत्र क्रमांक ग्रापापुवि/नियोजन/ निधी मागणी/२०१५, दिनांक ०४/६/२०१०.

४) शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग, क्रमांक पुनर्वि २०१०/प्र.क्र.-६/का-६, दिनांक १६ मार्च २०११.

**प्रस्तावना :**

संदर्भात नमूद केलेल्या अ.क्र. १ येथील शासन पत्रान्वये दिंडोरी व वाढीव कसबे वणी, ता. दिंडोरी, जि. नाशिक या पाणी पुरवठा योजनांना आदिवासी उपयोजनेंतर्गत खास बाब म्हणून मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनांना संदर्भात नमूद केलेल्या दि. ७ मार्च, २००९ च्या शासन निर्णयान्वये रु. ३३१.५४ लक्ष निधी उपलब्ध करुन देण्यात आला होता. आता योजनेतील उर्वरित कामे करण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची मागणी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांनी संदर्भात नमूद केलेल्या दि. ४.६.२०१० च्या पत्रान्वये शासनास केली आहे. त्याचा विचार करुन वर संदर्भात नमूद केलेल्या अ.क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये आदिवासी विकास विभागाने रु. २७५.०० लक्ष निधी पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन दिला आहे व सदर तरतूद या विभागाच्या अधिनस्त ठेवून त्यासाठी या विभागाच्या सचिवांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित केले आहे.

**शासन निर्णय :**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे आदिवासी विकास विभागाकडून मागणी क्र. टी-५ (०१)(०१) ग्रामीण भागामध्ये नळाद्वारे पाणी पुरवठा योजना (२२१५ ०५०६) ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन दिलेला रु. २७५.०० लक्ष (रुपये दोन कोटी पंच्याहत्तर लाख फक्त) निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांना दिंडोरी व वाढीव कसबे वणी, ता. दिंडोरी, जि. नाशिक या पाणी पुरवठा योजनांची उर्वरित कामे पूर्ण करण्यासाठी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.